कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत.

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग

**शासन आदेश, क्रमांकः एलटीएस ११२३/प्र.क्र. २३५/२०२३/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**दिनांक : १५ मार्च, २०२४.**

**वाचा :** मृद व जलसंधारण विभाग, आदेश क्रमांक- आस्थाप २०२३/प्र.क्र. १५९/जल २, दिनांक २६.०५.२०२३.

## शासन आदेश

मृद व जलसंधारण विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन शासन आदेशान्वये कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील श्री.प्रविण वसंत खेडकर यांच्या सेवा जलसंपदा विभागाकडे प्रत्यावर्तीत करण्यात आल्या आहेत. त्यानुसार श्री.खेडकर हे दिनांक ०२.०६.२०२३ रोजी जलसंपदा विभागात रुजू झाले आहेत. श्री.खेडकर प्रतिनियुक्तीने परत आल्यावर नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्यामुळे त्यांना महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीस अनुसरुन व नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीनुसार, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव खाली दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १. | श्री. प्रविण वसंत खेडकर | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | कार्यकारी अभियंता, कालवा संकल्पचित्र विभाग क्र. ४, नाशिक |

२. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांनी, श्री.खेडकर, कार्यकारी अभियंता हे पदस्थापनेच्या पदावर कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in** या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

३. संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदरहू आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून नियुक्ती रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील

नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या शासन संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१५१८३८२०७७२७ असा आहे. तसेच, सदर शासन आदेश जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDDHAV RABHAJI DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV RABHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV RABHAJI DAHIPHALE
Date: 2024.03.15 18:47:46 +05'30'

**( उ. र. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबइ्र.
५. अपर मुख्य सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महासंचालक व सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
८. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक.
९. आयुक्त, मृद व जलसंधारण, वाल्मी, छत्रपती संभाजी नगर.
१०. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
११. महालेखापाल, महाराष्ट्र १/ २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
१२. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१३. सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
१४. श्री.प्रविण वसंत खेडकर, कार्यकारी अभियंता.
१५. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१६. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.